**सहकार विभागाच्या क्षेत्रिय आस्थापनेवरील सहायक निबंधक, सहकारी संस्था, गट-ब या संवर्गातील अधिकारी यांच्या विभागीय संवर्ग वाटपात बदल करुन पदस्थापना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः** राजस-१२१५/प्र.क्र.२४/१२-स
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम काम मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १८ मार्च, २०१५

**वाचा :-**

१) **सा.प्र.वि. शा.नि.क्र.एसआरव्ही-२०१२/प्र.क्र.१८७/१२, दि.३१/०७/२०१२**
२) **सा.प्र.वि. शा.नि.क्र.एसआरव्ही-२०१२/प्र.क्र.३३९/१२, दि.२६/११/२०१२**
३) **सा.प्र.वि. शा.नि.क्र.एसआरव्ही-२०१२/प्र.क्र.३३९/१२, दि.११/८/२०१४**
४) **स.प.व व.वि. शा.नि.क्र.राजस-१२११/प्र.क्र.२८४/१२-स, दि.१९/८/२०१४**
५) **सहकार आयुक्त व नि बंधक, स.सं., महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्थापना/कक्ष-२/अ-१/सनि/बदली/२५/सन २०१४, दि.६/१/२०१५**
६) **मा.मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील समितीच्या दि.०४/०२/२०१५ च्या बैठकीचे इतिवृत्त.**

**प्रस्तावना :-**

सहकार विभागाच्या क्षेत्रिय आस्थापनेवरील श्री.एम.ए.कृपलानी, सहायक निबंधक, सहकारी संस्था (गट-ब) सेलू, जि.वर्धा यांना संदर्भाधीन ४ येथील शासन निर्णयान्वये विभागीय संवर्ग वाटप नियमावली-२०१० नुसार “नागपूर” महसूली विभागात पदस्थापना देण्यात आली आहे. त्यांनी सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त अनुक्रमांक ३ येथील शासन निर्णयातील नियम क्र.(अ) (७) नुसार त्यांची मुलगी सन २०१४-१५ या शैक्षणिक वर्षात इयत्ता १२ वी (विज्ञान शाखा) शिकत असल्याच्या कारणास्तव “नागपूर” ऐवजी “अमरावती” महसूली विभाग बदलून देण्याची विनंती केली आहे. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनास सादर केलेला महसूली विभाग बदलून देण्याचा प्रस्ताव मा.अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली घेण्यात आलेल्या दि.०४/०२/२०१५ च्या बैठकीत सादर करण्यात आला. सदर बैठकीत श्री.एम.ए.कृपलानी, सहायक निबंधक, सहकारी संस्था, गट-ब यांना “अमरावती” महसूली विभाग बदलून देण्याची विनंती समितीने मान्य केली आहे. त्यानुसार श्री.कृपलानी यांना “नागपूर” ऐवजी “अमरावती” महसूली विभाग बदलून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

सहकार विभागाच्या क्षेत्रिय आस्थापनेवरील श्री.एम.ए.कृपलानी, सहायक निबंधक, सहकारी संस्था, गट-ब (वेतन श्रेणी रु.९३००-३४८०० + ग्रेड पे ४४००/-) या संवर्गातील अधिकाऱ्यास संदर्भ क्र.२ मधील शासन निर्णयातील तरतूदीनुसार विभागीय संवर्ग वाटप अमरावती ऐवजी नागपूर विभाग करण्यात आला होता. सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय दि.११/०८/२०१४ मधील तरतूदीनुसार सदर विभागीय संवर्ग वाटपात बदल करण्यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधीन अनुक्रमांक ५

येथील पत्रानुसार सादर केलेल्या प्रस्तावास अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन केलेल्या समितीच्या दि.०४/०२/२०१५ रोजीच्या बैठकीमध्ये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार श्री.कृपलानी यांना खालीलप्रमाणे नागपूर ऐवजी अमरावती महसूली विभाग वाटप करण्यास व त्यांना बदलीने पदस्थापना करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव व पदनाम | सध्याची पदस्थापना | प्रस्तावित पदस्थापनेचे ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.एम.ए.कृपलानी, सहायक निबंधक, सहकारी संस्था | सहायक निबंधक, सहकारी संस्था, सेलू, जि.वर्धा | सहायक निबंधक, सहकारी संस्था, खामगांव, जि. बुलढाणा | रिक्त पदावर बदलीने पदस्थापना |

२. वरीलप्रमाणे पदस्थापना झालेल्या अधिकाऱ्यांचे गोपनीय अहवाल, सेवापुस्तक अंतिम वेतन प्रमाणपत्र तात्काळ नवीन कार्यालयाकडे पाठविण्याबाबत संबंधिताना सूचना देण्यात याव्यात.

३. संबंधीत अधिकाऱ्यांची शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये तसेच म.ना.से. (रजा) नियम १९८१ मधील नियम ३० सी नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारे रजेचे अर्ज स्विकारु नयेत असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्याने रजेचा अर्ज पाठविल्यास सदर अर्जाची दखल घेण्यात येणार नसल्याच्या सूचना संबंधिताना देण्यात याव्यात.

४. संबंधीत अधिकाऱ्यांनी केलेल्या विनंतीनुसार त्यांच्या विभागीय संवर्गात बदल करुन सुधारित पदस्थापना करण्यात येत असल्याने त्यांना पदस्थापनेच्या अनुषंगाने भत्ते व पदग्रहण अवधी अनुज्ञेय राहणार नाही.

५. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य पुणे यांनी सदरचे आदेश तत्काळ अंमलात येतील हे कृपया पहावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१८१८२२०३४२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Muloo Dhadwe

Digitally signed by Suresh Muloo Dhadwe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Suresh Muloo Dhadwe
Date: 2015.03.18 18:32:51 +05'30'

(सु.मु.धाडवे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. संचालक (वस्त्रोद्योग) औरंगाबाद.
४. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था.
५. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
६. जिल्हा उप निबंधक, सहकारी संस्था, वर्धा, बुलढाणा.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, वर्धा, बुलढाणा.
८. मा.मंत्री(सहकार)/मा.राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव
९. प्रधान सचिव (पणन)/(वस्त्रोद्योग), सचिव (सहकार) यांचे खाजगी सचिव.
१०. संबंधित अधिकारी द्वारा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था,म.रा.पुणे.
११. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२. कक्ष अधिकारी (५-स), स.प.व व.वि, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती.